विधि व न्याय विभाग (खुद्द) करिता ई गव्हर्नन्स प्रकल्प राबविणे व इतर बाबींसंदर्भात मार्गदर्शन व सल्ला देण्याकरिता ई गव्हर्नन्स सल्लागार नियुक्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : संगणक -२०२४/ प्र.क्र.११/का-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०००३२.
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा :-** १.विभाग (खुद्द) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १३/०३/२०२४ च्या बैठकीचे इतिचृत्त.
२. माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचा शासन निर्णय क्रमांक: GAD-IT ८०/ २०१४-O/O DIRECTORATE OF IT-DIT (MH), दिनांक ०५/१०/२०२३.

**शासन निर्णय :-**

विभाग (खुद्द) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १३/०३/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत विधि व न्याय विभाग (खुद्द) करिता ई गव्हर्नन्स प्रकल्प राबविणे व इतर बाबींसंदर्भात मार्गदर्शन व सल्ला देण्याकरिता सल्लागार नियुक्त करण्याच्या प्रस्तावास बैठकीत तत्वत: ( In principle ) मान्यता देण्यात आली असून, विभागास आवश्यकता असेल तेव्हा ई गव्हर्नन्स सल्लागार विभागास उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील empanelled फर्म्सपैकी KPMG Advisory Services Pvt. Ltd. मधील वरिष्ठ सल्लागार व सल्लागार यांची दिनांक ०५/१०/२०२३ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.VII नुसार जास्तीत जास्त २ महिन्यांकरीता नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पद | संख्या |
|---|---|---|
| १ . | वरिष्ठ सल्लागार | १ |
| २ . | सल्लागार | १ |

३. उपरोक्त सल्लागारांच्या संख्येत आवश्यकतेनुसार वाढ किंवा घट करण्याचा अधिकार विभागास राहील. तसेच सध्याची नियुक्ती विभागाच्या स्वेच्छाधिकारात मुदतवाढीस पात्र असेल.

४. सदर सल्लागारांना माहिती व तंत्रज्ञान विभागाने संदर्भ क्र.२ अन्वये विहित केल्यानुसार शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. .याप्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. जे-२, २०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, (००) विधी व न्याय विभाग, (००)(०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी तरतूद (२०५२ ५११६) - १७ संगणक खर्च" या लेखाशीर्षाखालील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय विधि व न्याय विभागाच्या (खुद्द) प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक १३/०३/२०२४ च्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत असून, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३० /२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या परिशिष्टातील भाग पहिला, उपविभाग -३ मधील अ. क्र. ४, परि.क्र.२७ (२) नुसार दिलेल्या अधिकारान्वये प्रस्तुत बाबीवर होणाऱ्या खर्चास मान्यता देण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय हा सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१५२१०००६९९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDKISHOR LALLU MORE

Digitally signed by NANDKISHOR LALLU MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=8e6e6ef027afaf311b73f55b93d66802f7572a95024328e2d647f7ef65a9432a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69426D4C260E75A2AE012E47A93A468B42FD9B82A0B40FBCADEA1F0C509379CC, cn=NANDKISHOR LALLU MORE
Date: 2024.03.15 21:09:39 +05'30'

**( नंदकिशोर मोरे )**
**विधि सल्लागार नि सह सचिव**

**प्रति:-**

१. मा.प्रधान सचिव व विधि परामर्शी यांचे स्वीय सहायक.
२. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर १/२
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर १/२
४. उप विधि सल्लागार नि-उप सचिव (का.१५), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आहरण व संवितरण अधिकारी (रोखशाखा), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. कार्यासन अधिकारी/का. २, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई, (देयकासह २ प्रती).
७. कार्यासन अधिकारी/का. २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
८ . निवडनस्ती/का. ७.